कोवीड-१९ च्या संभाव्य तिसऱ्या लाटेकरिता ऑक्सिजन (LMO) साठयासाठी लागणा-या (Dura Cylinder & Cryo Tanks) च्या खरेदीसाठी लागणारा अंदाजित रुपये २२७.०४ कोटी रकमेची खरेदी निविदा प्रक्रियेद्वारे करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
शासन निर्णय क्रमांकः खरेदी-२०२१/प्र.क्र.३५७/आरोग्य-५
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार
संकुल इमारत, १० वा मजला, मुंबई - ४०० ००१.
तारीख: १६ सप्टेंबर, २०२१

वाचा :

१) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र. राआसो/ऑक्सि कक्ष खरेदी प्रशा. मान्यता / ३६८१०/२०२१, दिनांक १६.०७.२०२१.

२) आयुक्त. आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक १५.०७.२०२१ रोजीची मान्य टिप्पणी.

प्रस्तावना :

तिस-या लाटेच्या पूर्वतयारीच्या उपाययोजनांच्या अनुषंगाने मा. उपमुख्यमंत्री व मा. मुख्य सचिव स्तरावर घेण्यात आलेल्या बैठकीमध्ये राज्यातील सर्व जिल्ह्यांना दुस-या लाटेदरम्यान लागलेला महत्तम ऑक्सिजन व महत्तम रुग्णसंख्या विचारात घेऊन त्याच्या तुलनेत २५% रुग्णवाढ लक्षात घेऊन लागलेल्या ऑक्सिजनच्या तीन पट ऑक्सिजन साठ्याची पूर्वतयारी करण्याबाबत सर्व संबंधित जिल्हाधिकारी यांना निर्देशित केले आहे. त्यानुसार जिल्हानिहाय उपलब्ध सिलेंडर्सचा आढावा घेण्यात आला आहे. तसेच सार्वजनिक आरोग्य विभाग व वैद्यकीय शिक्षण विभागाच्या संयुक्त बैठकीत राज्यात उपलब्ध होऊ शकणारी ऑक्सिजन साठा क्षमता व वाहतुकीसाठी उपलब्ध टँकर्स याचाही आढावा घेण्यात आला आहे.

त्यानुसार अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान, मुंबई यांनी दिनांक १६.०७.२०२१ अन्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार राज्यातील प्रत्येक जिल्हा ऑक्सिजन व इतर

साहित्याबाबत सक्षम वा परिपूर्ण व्हावा या दृष्टीने शासनाने दिनांक २६.०६.२०२१ रोजीच्या पत्रान्वये केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार राज्यातील सर्व जिल्ह्यांच्या ऑक्सिजनचा अभ्यास करून ऑक्सिजन (LMO) च्या साठ्यासाठी लागणा-या (dura Cylinder & cryo tank) च्या खरेदीसाठी अंदाजित खर्च रूपये २२७.०४ कोटी इतक्या रकमेच्या खरेदीस प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:**

अ) तिसऱ्या लाटेतील प्रक्षेपित रुग्ण संख्या, लागणारा ऑक्सिजन, उपलब्ध ऑक्सिजन साठा व आवश्यक असलेल्या अतिरिक्त ऑक्सिजन (LMO)च्या साठ्यासाठी खालील तक्यात नमूद केलेल्या ड्युरा सिलेंडर व क्रायो टँक्स या वैद्यकीय कारणासाठी आवश्यक असलेल्या साधनसाम्रगीच्या खरेदीस तसेच यासाठी होणाऱ्या अंदाजे रू.२२७ कोटी ४ लक्ष रुपयाची खरेदी विहित कार्यपध्दतीने करण्यास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | वैद्यकीय सामग्रीचे नाव व क्षमता | संख्या | अंदाजे किंमत (रुपये) | एकूण रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|---|
| १. | ड्युरा सिलेंडर (for medical oxygen) (३०० लिटर) | ३७९८ | ३,००,०००/- | १,१३,९४,००,०००/- |
| २. | क्रायो टँक (for liquid medical oxygen) (२० किलोलिटर) | २२६ | ५,००,०००/- | १,१३,१०,००,०००/- |
| | | | | एकूण- २,२७,०४,००,०००/- |

ब) सदर खरेदीसाठी लागणारा अंदाजे रु. २२७ कोटी ४ लक्ष इतका खर्च हा राज्य आपत्ती निवारण निधीतून उपलब्ध होणाऱ्या निधीतून करण्यास या शासन निर्णयाद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

क) सदर निधी उपलब्धतेसाठी महसूल व वन विभाग (आपत्ती निवारण व मदत व पुनर्वसन) यांची पूर्व मान्यता घेण्यात आलेली आहे.

ड) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. त्यानुसार खालील अटींच्या अधीन राहून प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

१) सदर साधन सामुग्रीची आवश्यकता / मागणी याची शहानिशा / खातरजमा करण्यात यावी. त्यानंतरच सदर बाबींच्या खरेदीसाठी निविदा प्रक्रिया राबविण्यात यावी.

२) सदरहू साधन सामुग्रीचे विनिर्देश गरजेनुसार व अद्ययावत असल्याची खातरजमा करण्यात यावी. खरेदी करावयाच्या बाबींचे तांत्रिक विनिर्देश (Technical specification) संबंधित तज्ञांनी (तांत्रिक समिती / अधिकारी) यांनी मान्य केलेल्या विनिर्देशानुसार असावेत. तसेच, सदर तांत्रिक विनिर्देश (Technical specification) हे कोणत्याही विशिष्ट कंपनीला फायदा होईल अशा रितीने तयार केलेले नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी. तांत्रिक विर्निदेशानुसार मागणीपत्र पाठविण्याची जबाबदारी संबंधीत कार्यक्रम प्रमुखांची राहिल. प्रस्तावात समाविष्ट असलेल्या बाबींचीच खरेदी करण्यात यावी.

३) प्रशासकीय मान्यता देताना प्रस्तावित खरेदीचे दर हे अंदाजित आहेत. त्यामुळे खरेदी प्रक्रियेअंती दर निश्चित करण्यात यावा. सदर दर हा बाजार भावापेक्षा कमी असल्याबाबत आणि संबंधित पुरवठादाराने या बाबीचा इतर ठिकाणी ज्या दराने पुरवठा केला आहे, त्या दरापेक्षा जास्त नसल्याबाबत खातरजमा करण्यात यावी.

४) खरेदी करण्यात येणाच्या बाबींची पुरवठापूर्व / पुरवठानंतर नमुना तपासणी (Pre/Post dispatch random sample Inspection) करून उचित व योग्य विनिर्देश (specification) असलेल्या वस्तूंचीच खरेदी करण्यात येईल, याची खात्री करण्यात यावी.

५) खरेदी करण्यात येणाऱ्या बाबींचा पुरवठा झाल्यानंतर त्यांची साठवणूक व वितरण (storage & distribution) करणे तसेच, पुरवठा साखळी व्यवस्थापन (Supply chain management) आणि वस्तुसूची व्यवस्थापन (Inventory Management) योग्य पध्दतीने करुन सदर बाबी विनावापर पडून राहणार नाहीत व त्यांचा विहीत मुदतीत वापर होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

६) तसेच, या बाबींच्या खरेदी द्विरुक्ती (Duplication) होणार नाही, याची दक्षता घेण्यात यावी.

७) संपूर्ण खरेदी प्रक्रिया राबविताना केंद्रिय दक्षता आयोगाच्या मार्गदर्शक सूचनांचे (CVC Guidelines) तंतोतत पालन करण्यात यावे.

८) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/भाग-२/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल,२०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अ. क्र ४ नियम क्र. ७ समोरील स्तंभ क्र.६ येथील अटींची पूर्तता करण्यात यावी.

९) खरेदी प्रक्रिया पूर्ण झाल्यानंतर खरेदी समितीच्या मान्यतेनंतरच पुरवठा आदेश निर्गमित करण्यात यावेत. सदर प्रकरणी सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्र. खरेदी २०१६/प्र.क. २४०/ आरोग्य-८ दिनांक २६ जुलै, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी,

उपरोक्त अनुक्रमांक १ ते ९ येथे नमूद अटींची पूर्तता करण्याची व खरेदी नियमानुसार व आवश्यकतेप्रमाणे आहे हे सुनिश्चित करण्याची संपूर्ण जबाबादारी आयुक्त, आरोग्य सेवा व अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, संचालक, आरोग्य सेवा संचालनालय यांची राहील,

इ) सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४३४५. दि. ०८/०९/२०२१ नुसार मिळालेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२०२१०९१४१७१४२६३६१७ असा आहे.

हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ARCHANA VILAS WALZADE

Digitally signed by ARCHANA VILAS WALZADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b17094004b015083dae757656e5d24847898197ddd6b0366a9177f097ed0887a, pseudonym=EFE0AAA7FB78AD706283B7A34C5FC48C1920AEBD, serialNumber=B4E19876AB3EEC36E3A3B988441648AB87470CDFE66B14CFBE7AC9BD770485C1, cn=ARCHANA VILAS WALZADE
Date: 2021.09.16 15:55:28 +05'30'

**(अर्चना वालझाडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत -:

१) अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, महसूल व वन विभाग / आपत्ती निवारण व मदत व पुनर्वसन
३) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) उपसचिव, मुख्य सचिव यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
५) महालेखापाल, (लेखापरीक्षा) / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १-२,
६) सर्व सहसचिव / उपसचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग,
७) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई पुणे
८) अतिरिक्त अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
९) सर्व सहसंचालक (आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
१०) उप संचालक, आरोग्य सेवा, सर्व मंडळ कार्यालये,
११) निवड नस्ती (आरोग्य-५)